७५।५७

जल व भूमि व्यवस्थापन संस्था (वाल्मी), औरंगाबाद येथे आयोजित प्रशिक्षण कार्यक्रमाबाबत..

महाराष्ट्र शासन
जलसंपदा विभाग,
शासन परिपत्रक क्र.संकीर्ण-१००६/४६/(८७/२००६)/आ.(प्रशि)
मंत्रालय,मुंबई-४०० ०३२.
दिनांक : २४ मार्च,२००६.

पहा : १) शासन परिपत्रक क्र.ईएसटी १०९९/(१५०/९९)/पासं, दि.१६.४.२००१
२) शासन परिपत्रक क्र.संकीर्ण १००४/(१२८/०४)/ला(आ), दि.११.१०.२००४

**प्रस्तावित :**

जल व भूमि व्यवस्थापन संस्था (वाल्मी) तर्फे जलसंपदा विभागातील अभियंत्यांना सिंचन व्यवस्थापनातील प्रगत तंत्रज्ञानाचे प्रशिक्षण दिले जाते. तसेच तंत्रज्ञानातील वाढते संशोधन प्रशिक्षणाद्वारे क्षेत्रिय अधिकाऱ्यांपर्यंत पोहोचविले जाते. अभियंत्यांचा सर्वांगिण विकास होण्यासाठी हे प्रशिक्षण शासन परिपत्रक दि.१६.४.०१ अन्वये अनिवार्य करण्यात आले आहे. या अनुषंगाने वाल्मी व अभियांत्रिकी अधिकारी महाविद्यालय, नाशिक यांनी एकत्रितपणे जलसंपदा व सार्वजनिक बांधकाम विभागातील अभियंत्यांचा वैयक्तिक तपशील संगणकीकृत करुन त्यांच्या एकूण कार्य कालावधीपैकी ३ टक्के कालावधी प्रशिक्षणात व्यतीत होईल, याची खबरदारी घ्यावयाची आहे. त्याचप्रमाणे शासनाच्या दि.११.१०.२००४ च्या परिपत्रकानुसार प्रशिक्षणासाठी नामांकने पाठवावयाची जबाबदारी संबंधित अधीक्षक अभियंतांवर टाकण्यात आलेली आहे. मात्र क्षेत्रिय अधिकाऱ्यांकडून आवश्यक प्रमाणात नामांकने वेळीच प्राप्त होत नाहीत असे निदर्शनास आले आहे. त्यामुळे अधिकारी/ कर्मचारी ह्यांना वैयक्तीकरित्या प्रशिक्षण करुन त्याचा लाभ त्यांना शासन सेवेत व्हावा व पर्यायाने समाजाच्या विकासासाठी त्याची उपयुक्तता व्हावी हा मुळ हेतू असफल होत असल्याचेही दृष्टोत्पत्तीस येते. त्यादृष्टीने उपाययोजना म्हणून शासनाने पुढीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय :**

जलसंपदा विभागांतर्गत अभियंत्यांनी एकूण सेवेच्या कालावधीमध्ये ३ टक्के कालावधी विविध प्रशिक्षण घेण्यासाठी व्यतीत केला आहे किंवा नाही हे नियंत्रण ठेवण्यासाठी पुढील प्रमाणे नियंत्रक अधिकारी घोषित करण्यात येत आहे.



संकेतांक क्रमांक - 201412081109550527

| अ.क्र. | पदनाम | नियंत्रक अधिकारी |
|---|---|---|
| १ | कनिष्ठ अभियंता, शाखा अभियंता, सहायक अभियंता श्रेणी-२ | नियंत्रक कार्यकारी अभियंता |
| २ | उपविभागीय अभियंता, उपविभागीय अधिकारी, सहायक अभियंता श्रेणी-१ | नियंत्रक अधीक्षक अभियंता |
| ३ | कार्यकारी अभियंता | नियंत्रक मुख्य अभियंता |
| ४ | अधीक्षक अभियंता, मुख्य अभियंता | शासनस्तरावर |

नियंत्रक अधिकाऱ्यांनी त्यांच्या अधिपत्याखालील अभियंता/ कर्मचारी ह्यांचा संगणकीय डाटा बेस तयार करावा. तसेच वेगवेगळ्या संस्था व विशेषतः वाल्मी मध्ये उपलब्ध प्रशिक्षणासाठी नामांकने तयार करुन संबंधित संस्थांकडे पाठवावीत. प्रशिक्षणासाठी संबंधित अधिकाऱ्यांची निवड झाल्यास त्यांना प्रशिक्षणासाठी तात्काळ कार्यमुक्त करावे. प्रशिक्षण पूर्ण झाल्यानंतर प्रशिक्षणविषयक अहवाल न चुकता घ्यावा. तसेच प्रशिक्षण अहवाल व प्रशिक्षण पूर्ण केल्याची नोंद संबंधितांच्या सेवापुस्तकात व गोपनीय अहवाल धारिकेत ठेवावी. ही सर्व जबाबदारी नियंत्रक अधिकाऱ्यांची राहील.

त्याचबरोबर प्रशिक्षणास निवड होऊनही, जाणीवपूर्वक प्रशिक्षण टाळण्याचा प्रयत्न केल्यास शासनाच्या प्रचलित आदेशानुरुप दंडात्मक रक्कम वसूल करणेविषयी कार्यवाही नियंत्रक अधिकाऱ्यांनी करावी.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

( श. पा. वारे )
शासनाचे अवर सचिव

प्रत,

सचिव (पा), पाटबंधारे विभाग, मंत्रालय, मुंबई
सचिव (लाक्षेवि), पाटबंधारे विभाग, मंत्रालय, मुंबई
सर्व कार्यकारी संचालक, पाटबंधारे विकास महामंडळे
सर्व प्रादेशिक मुख्य अभियंता/ अधीक्षक अभियंता, पाटबंधारे विभाग
अधीक्षक अभियंता व सहसंचालक, वाल्मी, औरंगाबाद
आ(लाक्षेवि),
आ.(प्रशि) कार्यासन, संग्रहार्थ